कौटुंबिक न्यायालय, नांदेड या न्यायालयीन इमारतीमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी/अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांक : याचिका १८१७/४७७/प्र.क्र.१२७/का.०९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ डिसेंबर, २०१८

**वाचा :**

१) प्रबंधक (निरीक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W) ६०५४ of १९८६, दि. ०५.०५.२०१७.
२) उप प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W) ६०५४ of १९८६, दि.१५.११.२०१७
३) अग्निशमन अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड यांचे पत्र क्र.नांवाशमनपा/अवअसे/८८७/१७, दि.१८.१०.२०१७
४) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. याचिका १८१७/४७७/प्र.क्र.१२७/का.०९, दि.३१.०८.२०१८
५) कौटुंबिक न्यायालय, नांदेड यांचे पत्र क्र.९२८/२०१८, दि.१७.११.२०१८

**प्रस्तावना :**

मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्रमांक २१६/२०१० मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दिलेल्या आदेशांस अनुलक्षून राज्यातील सर्व न्यायालयीन इमारतींचे फायर ऑडीट करण्यात येत असून अग्नीशमन यंत्रणा उभारणी/अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यात येत आहेत.

त्या अनुषंगाने कौटुंबिक न्यायालय, नांदेड च्या न्यायालयीन इमारतीमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी/अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यास संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. सबब संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये कौटुंबिक न्यायालय, नांदेड यांनी न्यायालय भाडेतत्वावरील इमारतीमध्ये कार्यरत असून न्यायालयाच्या इमारतीमध्ये भाडेकरु सुद्धा राहत असल्याने तसेच पाणी साठवण्यासाठी २५,०००/- लिटर क्षमतेची भुमीगत टाकी बांधण्यासाठी जागा उपलब्ध नसल्यामुळे व अग्नीशमन प्रतिबंधात्मक साहित्य हे सुस्थितीत तसेच तात्काळ उपलब्ध होईल अशा ठिकाणी ठेवण्याकरीता जागा उपलब्ध नसल्याने कौटुंबिक न्यायालय, नांदेड या न्यायालयाच्या ईमारतीमध्ये अग्निशमन प्रतिबंधात्मक उपाययोजना करणे शक्य नसल्याचे शासनास कळविले असून

प्रशासकिय मान्यता रदद् करण्याची विनंती केली आहे. त्यामुळे संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णय अधिक्रमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

कौटुंबिक न्यायालय, नांदेड येथे अग्नीशमन यंत्रणा उभारणी/अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावासोबतच्या अंदाजपत्रकात १८% वस्तु व सेवा कर ची तरतूद करुन सार्वजनिक बांधकाम विभागाने अंदाजपत्रकीय रक्कम परिगणित केल्यानुसार एकूण रु.१४,०९,५०६/- (रुपये चौदा लक्ष नऊ हजार पाचशे सहा फक्त) इतक्या खर्चाच्या कामांस संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२६१५३७५०२४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1f733daf00a6028414c43d0cc10d82acab3b732c4edd56e818f8a3b355588753, serialNumber=9ebeebf21dc54ceec51e6d5ffc84bb94ca6af89497279007d66e97dc13547037, cn=Amogh Shyamkant Kaloti
Date: 2018.12.26 15:46:48 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१. मा. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
२. प्रबंधक (निरीक्षणे-१ व २), मा.उच्च न्यायालय, मुंबई.
३. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड.
४. न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, नांदेड.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १/२), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा १/२), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
८. अग्निशमन अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
९. उप जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड.
१०. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
११. विधि व न्याय विभाग (का.२३), मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (का-९).